सिरपूर, ता.देवरी, जि.गोंदिया या जलाशयाचे वक्रव्दारे अग्रस्थ नियंत्रण सेवाव्दारे व आपतकालीन व्दारांची दुरुस्ती कामांची प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१६/ (प्र.क्र. ७६१ /२०१६)/सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २२ /०६ /२०१७.

वाचा :-१. कार्यकारी संचालक,विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.८८३६/वि.पा.वि.म./कातां-६(१)/अपामं/सिरपूर-३४६/ २०१६, दि.०५.११.२०१६.
२. शासन निर्णय क्र संकीर्ण २०१६/(२७/२०१६)/लपा २/ दि.२६.५.२०१७

**प्रस्तावना :-**

देवरी तालुक्यातील सिरपूर प्रकल्पाचे बांधकाम सन १९७० मध्ये पूर्ण होऊन सन १९८२ मध्ये सदर प्रकल्प सिंचन व्यवस्थापन व देखभाल दुरूस्तीकरीता हस्तांतरीत झाला आहे. सिरपूर मध्यम प्रकल्प हा महाराष्ट्र व मध्यप्रदेश या दोन राज्यातील आंतरराज्यीय बाघ प्रकल्प समूहाचा एक भाग आहे. आंतरराज्यीय करारानुसार प्रकल्पावर होणाऱ्या खर्चाचा वाटा मध्यप्रदेशाचा २५% व महाराष्ट्रास ७५% सोसावा लागतो. सदर प्रकल्पाच्या माती धरणाची लांबी २८५७ मीटर असून महत्तम उंची २८.९५ मीटर आहे. तसेच प्रकल्पास दगडी बांधकामातील १३७.७७ मीटर लांबीचा ogee type सांडवा आहे. सदर धरणाचा एकूण पाणीसाठा १७१.१० दलघमी व उपयुक्त पाणीसाठा १५९.७८ दलघमी इतका आहे. सन २०१४-१५ वर्ष सरासरी पाणीसाठा १५९.७८ दलघमी होता. तसेच सदर प्रकल्पाचा प्रत्यक्ष सिंचन क्षेत्र २५४९३ हेक्टर आहे.

धरण सुरक्षितता अंतर्गत द्वार निरीक्षण पथक, औरंगाबाद यांच्या पूर्णत: पूर्ण निरीक्षण टिप्पणी मध्ये सदर प्रकल्पांची द्वारांची दुरुस्ती व विद्युतचलित यंत्रणा बसविणे इ. काम आवश्यक असल्याचे नमुद केले आहे. त्यानुषंगाने सदर यांत्रिकी कामांचा समावेश या अंदाजपत्रकात करण्यात आला आहे. सदर जलाशंयाच्या व्दारांची विशेष दुरुस्तीमुळे धरणावील व्दारांचे परिचलन धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने अत्यंत परिणामकारक संचलन व नियंत्रण होईल. याअनुषंगाने याअनुषंगाने संदर्भ क्र २ येथील शासन निर्णयानन्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर दुरूस्तीच्या कामाकरीता विशेष दुरूस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर अंतर्गत सिरपूर, ता.देवरी, जि.गोंदिया या जलाशयाचे वक्रव्दारे अग्रस्थ नियंत्रण सेवाव्दारे व आपतकालीन व्दारांची दुरूस्तीच्या कामांसाठी विशेष दूरूस्ती/ विस्तार व सुधारणा अंतर्गत रू. १,७०,३२,७२०/- व २०% नक्षलग्रस्त भत्ते ३४,०६,५४४/-, अनुषंगिक खर्च रू. १७,०३,२७२.००/- अशा एकूण रू. **२,२१,४२,५३६.००./-** (**रू. दोनशे एकवीस लाख बेचाळीस हजार पाचशे छत्तीस फक्त** ) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये विभगास दिलेल्या अधिकारान्वये व आंतरवित्तीय सल्लागार तथा उप सचिव यांच्या सहमतीने एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि.१.०१.२०१५ तील मार्गदर्शक सूचनानुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.
२. प्रकल्पा वरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे; कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.
३. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/संकल्पने व दरसूचीबाहय बाबी व वहन अंतरे सक्षमस्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.
४. जलाशयाचे वक्रव्दारे,अग्रस्थ नियंत्रण, सेवाव्दारे व आपतकालीन व्दारांची दुरुस्ती कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत. तथापि, यांत्रिकी संघटनेकडे मशिनरी उपलब्ध नसल्यास तसे प्रमाणपत्र यांत्रिकी संघटनेकडून प्राप्त करून घ्यावे.
५. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.
६. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (११) विदर्भ प्रदेश, (११) (०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १५८) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ०५ सन २०१७-१८ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक २०१७०६२२१३४३५४३८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.06.22 13:47:29 +05'30'

(न.गौ.बसेर)
**शासनाच्या अवर सचिव**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष,विधानसभा,विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद,विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) प्रधान सचिव(जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

९) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
११) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१२) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
१३) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर ,
१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधीकरण, नागपूर ,
१६) कार्यकारी अभियंता, बाघ इटिया डोट पाटबंधारे विभाग,गोंदिया,
१७) सिं.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१६/ (प्र.क्र. ७६१ /२०१६)/ सिं.व्य.(कामे), दि. २२ /०६/२०१७ चे सहपत्र

## परिशिष्ट-अ

| अ.क्र. | कामाचा तपशील | प्र.मा.रक्कम (रूपयात) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | वक्रव्दारे-साईज १२.१९ X ४.८७ मी. - ७ नग - उच्चालकासह ४० मे.टन,<br>सिंचन विमोचक व्दारे - आपत्कालीन व्दार- आकार - १.५२ X २.४४ मी. - १ संच<br>सिंचन विमोचक सेवाव्दारे - साईज- १.५२ X २.४४ मी. - ३ नग<br>तसेच डी.जी.सेटची उभारणी करण्याकरीता नवीन कंट्रोल पॅनल, केबलिंग इ. | १,७०,३२,७२०.०० |
| | २०% नक्षलग्रस्त भत्ते | ३४,०६,५४४.०० |
| | अनुषंगिक खर्च | १७,०३,२७२.०० |
| | **एकूण** | **२,२१,४२,५३६.००** |

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.06.22 13:48:49 +05'30'

**( न.गौ.बसेर )**
शासनाच्या अवर सचिव